**तंत्रशिक्षण संचालनालयांतर्गत शासकीय/ अशासकीय अभियांत्रिकी, औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालये व तंत्रनिकेतनांमध्ये अद्ययावत सुविधायुक्त उत्कृष्टता केंद्र स्थापन करण्यास मान्यता देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: तंवायो-१४२३/प्र.क्र.८३/२३/तांशि-३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२,
दिनांक: ०७ जुलै, २०२३.

वाचा: -

१) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि.१७/०४/२०१५.
२) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दि.०१/१२/२०१६.
३) शासन निर्णय उद्योग, उर्जा व कामगार विभाग क्र. संकीर्ण-२०१६/प्रक्र.२१५/उद्योग-४, दि.२४/०८/२०१७.
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२/०४/२०२३.
५) संचालक, तंत्रशिक्षण यांचे पत्र क्र.१७/तंशिसं/CoE/२०२३/१०७, दि.१८/०४/२०२३.
६) मा.मंत्रीमंडळाच्या दि.२८/०६/२०२३ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

प्रस्तावना:-

राज्यातील उद्योगधंद्यांमध्ये वापरात असलेल्या तंत्रज्ञानामध्ये नवीन तंत्रज्ञानाच्या सहाय्याने उद्योगधंद्यांच्या वाढीसाठी आवश्यक ते संशोधन करणे, उद्योगधंद्यांशी समन्वय वाढविणे, मनुष्यबळ निर्माण करणे व रोजगार निर्मितीच्या संधी उपलब्ध करून देणे आवश्यक आहे.

प्रस्तावित योजनेची उपयुक्तता, विद्यार्थ्यास रोजगाराभिमुख करण्याची क्षमता आणि शैक्षणिक संस्थेस होणारा फायदा व भविष्यातील Digitalization ची आव्हाने तसेच उच्च व तंत्रशिक्षण विभागाचे नवीन राष्ट्रीय शैक्षणिक धोरण, २०२० मधील धोरणात्मक बाबी सक्षमपणे राबविणे आवश्यक आहे.

तसेच मा.वित्त मंत्री यांच्या सन २०२३-२४ च्या अर्थसंकल्पिय भाषणातील मुद्याच्या अनुषंगाने, तंत्रशिक्षण संचालनालय अंतर्गत येणाऱ्या शासकीय/अशासकीय अभियांत्रिकी, औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालये व तंत्रनिकेतनांमध्ये अद्ययावत सुविधायुक्त १० उत्कृष्टता केंद्र (Centre of Excellence) स्थापन करण्याचे प्रस्तावित केले आहे. त्यास अनुसरुन संचालक, तंत्रशिक्षण यांनी संदर्भाधीन दि.१८/०४/२०२३ च्या पत्रान्वये प्रस्ताव सादर केला होता. याबाबत मा.मंत्रीमंडळाच्या दि.२८/०६/२०२३ रोजीच्या बैठकीत शासकीय/अशासकीय अभियांत्रिकी, औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालये व तंत्रनिकेतनांमध्ये अद्ययावत सुविधायुक्त १० उत्कृष्टता केंद्र स्थापन करण्याचा निर्णय घेण्यात आला.

**शासन निर्णय:-**

तंत्रशिक्षण संचालनालय अंतर्गत येणाऱ्या शासकीय/अशासकीय अनुदानित अभियांत्रिकी, औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालये व तंत्रनिकेतनांमध्ये खालीलप्रमाणे अद्ययावत सुविधायुक्त १० उत्कृष्टता केंद्र (Centers of Excellence) स्थापन करण्यास मान्यता देण्यात येत आहे:-

| अ. क्र. | संस्थेचे नांव | उत्कृष्टता केंद्राचा विषय | मंजूर निधी (रुपये कोटीत) | | |
|---|---|---|---|---|---|
| | | | आवर्ती खर्च | अनावर्ती खर्च | एकूण |
| १ | सीओईपी तंत्रशास्त्र विद्यापीठ, पुणे. | Industrial Product Design. | २.२५ | २.७५ | ५.०० |
| २ | व्ही.जे.टी.आय., मुंबई. | Artificial Intelligence. | २.८५ | २.१५ | ५.०० |
| ३ | शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, नागपूर. | Energy Conservation and Renewable Energy Utilization. | २.१५ | २.९० | ५.०५ |
| ४ | शासकीय औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालय, छत्रपती संभाजीनगर. | Industrial Pharmacy Innovation and Research. | ८.२५ | ०.३१ | ८.५६ |
| ५ | शासकीय औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालय,कराड, सातारा. | Sophisticated Analytical Instrument Facility Laboratory (SAIFL). | ३.७५ | १.२५ | ५.०० |
| ६ | शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, छत्रपती संभाजीनगर. | Thinking System for signal & imager Processing. | ३.८५ | १.२० | ५.०५ |
| ७ | शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, अमरावती. | Digitalization through Simulation<br>A)Electrical Vehicle<br>B)Engg. Simulation Lab.<br>C)E.S.D.M. | ०.९८ | ४.२२ | ५.२० |
| ८ | शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, यवतमाळ. | Digitalization through Simulation.<br>A)Drone.<br>B) Engg. Simulation Lab.<br>C) Additive Manufacturing | ०.९३ | ३.९७ | ४.९० |
| ९ | शासकीय अभियांत्रिकी व संशोधन महाविद्यालय, अवसरी, पुणे. | Digitalization through Simulation.<br>A)Electrical Vehicle.<br>B)Engg. Simulation Lab.<br>C)Additive Manufacturing. | १.०३ | ४.३७ | ५.४० |
| १० | शासकीय तंत्रनिकेतन, कोल्हापूर. | Digitalization through Simulation.<br>A)IOT.<br>B)Engg. Simulation Lab.<br>C)Unmanned aerial Vehicle Lab/ Drone Lab. | ०.८६ | ३.६४ | ४.५० |
| | | **एकूण** | **१३.८१** | **३९.८५** | **५३.६६** |

३. वरीलप्रमाणे उत्कृष्टता केंद्र स्थापन करण्यासाठी खालील बाबी विचारात घेण्यात आल्या आहेत:-

१) ज्या विषयांत उत्कृष्टता केंद्र स्थापन करावयाचे आहे, त्या शाखेचे एनबीए मानांकन.
२) ज्या विषयांत उत्कृष्टता केंद्र स्थापन करावयाचे आहे, त्या विषयाचा Principal Investigator व संस्थेमधील त्या विषयाच्या इतर अध्यापक.
३) उत्कृष्टता केंद्र स्थापन करण्याकरीता उपलब्ध जागा.
४) ज्या विषयांत उत्कृष्टता केंद्र स्थापन करावयाचे आहे, त्या विषयासंबंधी Industry / Research Institute यांच्या मधील MoU.
५) ज्या विषयांत उत्कृष्टता केंद्र स्थापन करावयाचे आहे, त्या विषयाशी निगडीत प्रस्तावित संस्थेकरीता Mentor Industry / Mentor Research Institute.
६) उत्कृष्टता केंद्र स्थापन करण्याकरीता लागणारी आवश्यक Equipment's ची सुधारित Specifications व त्यांच्या किंमती.
७) उत्कृष्टता केंद्रामध्ये बाह्य Industry / Research Institute यांचेकडून आर्थिक सहभाग.
८) उत्कृष्टता केंद्राकरीता संस्था स्तरावरील, उद्योगधंद्यातील तज्ज्ञ व नामांकित संस्थांतील प्राध्यापक यांचेसह Advisory Committee.
९) उत्कृष्टता केंद्राकरीता Procurement Plan / Process.

४. उपरोक्त नमूद १० संस्थामध्ये आर्थिक वर्ष २०२३-२४ ते २०२६-२७ या ४ वर्षांकरीता उत्कृष्टता केंद्र स्थापन करणे व त्याची अंमलबजावणी करण्याची कार्यपध्दती खालीलप्रमाणे आहे:-

**१) खरेदी:-**

अ) ज्या संस्थांमध्ये एकाच प्रकारची यंत्रसामुग्री खरेदी करावयाची आहे, अशा प्रकारची खरेदी प्रक्रिया तंत्रशिक्षण संचालनालय स्तरावर एकत्रितरित्या राबवून खरेदी करण्यांत येईल.
आ) ज्या संस्थांमध्ये वेगवेगळ्या प्रकारची यंत्रसामुग्री खरेदी करावयाची आहे, अशा प्रकारची खरेदी प्रक्रिया संबंधित संस्थास्तरावर राबवून खरेदी करण्यांत येईल.
इ) सदरहू दोन्ही स्तरावरील खरेदी प्रक्रीया पार पाडताना खरेदी संदर्भातील वित्त विभागाच्या वित्तिय अधिकारा संदर्भात संदर्भाधीन दि.१७/०४/२०१५ च्या शासन निर्णयातील वित्तीय अधिकार व उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या खरेदी धोरणाबाबतच्या संदर्भाधीन दि.०१/१२/२०१६ व सामान्य प्रशासन विभागाच्या ई-प्रशासन धोरणाबाबतच्या दि.२३/०९/२०११ या आदेशात नमूद कार्यपध्दतीनुसार GeM पोर्टलवरुन खरेदी प्रक्रिया राबविण्यात येईल.

**२) प्रकल्पाचे नियोजन व अंमलबजावणी:-**

सदर प्रकल्पाचे नियोजन, अंमलबजावणी व प्रकल्पावर देखरेख करण्यासाठी खालीलप्रमाणे दोन समित्या गठीत करण्यात येत आहेत.

**अ) राज्यस्तरीय नियोजन व अंमलबजावणी समिती.**

राज्यस्तरीय नियोजन व अंमलबजावणी समितीची रचना:-

| अ.क्र. | तपशिल | पदनाम |
|---|---|---|
| १ | नामांकीत उद्योजक/तंत्रज्ञ. | अध्यक्ष |
| २ | उप सचिव, तंत्रशिक्षण उपविभाग. | सदस्य |
| ३ | नामांकीत उद्योजक/तंत्रज्ञ (२) | सदस्य |
| ४ | नामांकीत संस्थेतील शिक्षण तज्ञ (१) (IIT/NIT/Research Institute मधील प्राध्यापक दर्जाचा प्रतिनिधी) | सदस्य |
| ५ | तंत्रशिक्षण विषयक प्रकल्प अंमलबजावणीचा अनुभव असलेले राष्ट्रीय/ राज्य पातळीवरील तज्ञ (१) | सदस्य |
| ६ | संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय. | सदस्य सचिव |

**ब) संस्था स्तरावरील समिती:-**

संस्था स्तरावरील समितीची रचना:-

| अ.क्र. | तपशिल | पदनाम |
|---|---|---|
| १ | संबंधित विषयातील नामांकित उद्योजक/तंत्रज्ञ | अध्यक्ष |
| २ | संबंधित संस्थाप्रमुख (कुलगुरु/संचालक/प्राचार्य) | सदस्य |
| ३ | तंत्रशिक्षण विषयक प्रकल्प अंमलबजावणीचा अनुभव असलेले राज्य पातळीवरील तज्ञ (१). | सदस्य |
| ४ | नामांकित संस्थेतील शिक्षण तज्ञ (१). (IIT/NIT/Research Institute मधील प्राध्यापक दर्जाचा प्रतिनिधी) | सदस्य |
| ५ | सहसंचालक, तंत्रशिक्षण विभागीय कार्यालय. | सदस्य |
| ६ | उत्कृष्टता केंद्राचे Principal Investigator. | सदस्य सचिव |

**क)** सदर प्रकल्पाच्या अंमलबजावणीकरीता संस्था स्तरावरील समितीची बैठक ३ महिन्यांतून एकदा व राज्यस्तरीय नियोजन व अंमलबजावणी समितीची बैठक ६ महिन्यांतून एकदा आयोजित करणे आवश्यक आहे.

**३) प्रकल्प अंमलबजावणी करण्याकरीता Research Scholars नेमणे:-**

१) प्रत्येक संस्थेत प्रती वर्षी ३ ते ४ Research Scholars ना संधी देणे अपेक्षित आहे. Research Scholars निवड संबंधित संस्थेव्दारे पारदर्शक पध्दतीने करण्यात येईल.

२) सदरच्या Research Scholars च्या नियुक्तीसाठी अभियांत्रिकी / औषधनिर्माणशास्त्र विषयातील पदवी/पदव्युत्तर पदवी ही किमान शैक्षणिक अर्हता असावी. तथापि, याबाबत सविस्तर अर्हता व कार्यपध्दती स्वतंत्ररीत्या ठरविण्यात येईल.

३) Research Scholars यांना दरमहा रु.३०,०००/- इतके पाठ्यवेतन (Stipend) देय असेल.

५. सदर उत्कृष्टता केंद्राच्या स्थापनेपासून प्रथम ४ वर्ष हे केंद्र चालविण्यासाठी राज्य शासनाकडून निधी देण्यात येईल. तथापि, ४ वर्षाच्या कालावधीनंतर संस्थेने स्वयं अर्थसहाय्यित तत्त्वावर उत्कृष्टता केंद्र चालविणे आवश्यक राहील.

६. **आर्थिक भार:-**

तंत्रशिक्षण संचालनालय अंतर्गत येणाऱ्या शासकीय/अशासकीय अनुदानित संस्थांमध्ये अद्ययावत सुविधायुक्त १० उत्कृष्टता केंद्र स्थापन करण्यासाठी आवर्ती खर्चासाठी १३.८१ कोटी व अनावर्ती खर्चासाठी रु.३९.८५ कोटी असा अंदाजे एकूण रु.५३.६६ कोटी इतका आर्थिक भार शासनावर येणार आहे.

त्यापैकी आवर्ती खर्च हा विद्यार्थी, संस्थेतील कर्मचारी व उद्योगधंद्याशी संबंधित तंत्रज्ञ यांचे प्रशिक्षण, रिसर्च फेलोशीप मानधन, विद्यार्थी/तज्ञ/प्राध्यापक यांचे मानधन व राष्ट्रीय/आंतरराष्ट्रीय प्रवासासाठीचा खर्च, वर्कशॉप/कॉन्फरन्स यांचे आयोजन करणे आणि पेटंट, कॉपीराईट व ट्रेडमार्क याकरीता नोंदणी शुल्क इ.साठी खर्च होणार आहे.

तसेच अनावर्ती खर्च हा संगणक सॉफ्टवेअर व हार्डवेअर, सॉफ्टवेअर नुतणीकरण करणे, यंत्रसामग्री खरेदी इ. प्रयोजनासाठी खर्च होणार आहे. वरीलप्रमाणे आवर्ती व अनावर्ती खर्च हा ४ वर्षात टप्प्याटप्प्याने होणार असुन, एकूण प्रकल्प खर्च रु.५३.६६ कोटीपैकी सन २०२३-२४ या आर्थिक वर्षामध्ये अंदाजे रु.२०.०० कोटी इतका खर्च करण्यात येणार आहे.

सदर १० उत्कृष्टता केंद्र स्थापन करण्यास होणारा आवर्ती/अनावर्ती खर्चासाठी पुढील अटींच्या अधिन राहून टप्याटप्याने निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे:-

१. एकाच संस्थेत/महाविद्यालयात एकापेक्षा अधिक उत्कृष्टता केंद्रे स्थापन करण्यात येणार नाहीत.
२. सदर उत्कृष्टता केंद्राकरीता खरेदी विहित पध्दतीने करण्यात यावी.
३. सदर शासन निर्णयामध्ये नमूद केलेल्या खर्चाव्यतिरिक्त अधिक खर्चाची मागणी करता येणार नाही.
४. प्रस्तावित केलेल्या उत्कृष्टता केंद्रे स्थापन झाल्यास दर ४ वर्षांनी उद्दीष्टपुर्ततेबाबत आढावा घेण्यात यावा.
५. सदर उत्कृष्टता केंद्र (Centre of Excellence) स्थापन करण्यासाठी कोणत्याही प्रकारे नियमित पदांची निर्मिती करण्यात येणार नाही, सदर केंद्रांसाठी आवश्यक असलेले मनुष्यबळ हे सध्या कार्यरत असलेल्या शिक्षकीय व समकक्ष पदांमधून भागविण्यात यावे.

७. सदरहू खर्च हा “मागणी क्र.डब्ल्यू-३, २२०३-तंत्रशिक्षण, १०४, अशासकीय तंत्र महाविद्यालये व संस्था यांना सहाय्य (०२) परिरक्षण अनुदान, (०२)(०३)- अभियांत्रिकी महाविद्यालये (कार्यक्रम) २२०३ ०१९४, ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर)” या लेखाशिर्षाखाली खर्ची दर्शविण्यात येईल.

८. हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१८५/१४७१, दि.२४/०४/२०२३ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४८०/व्यय-५, दि.०३/०५/२०२३ अन्वये प्राप्त सहमतीनुसार

तसेच मा. मंत्रीमंडळाच्या दि.२८ जून, २०२३ रोजीच्या बैठकीत मान्यता प्रदान केल्यानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन, त्याचा सांकेतांक २०२३०७०७११२५५४४६०८ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SATISH JAGDERAO TIDKE

Digitally signed by SATISH JAGDERAO TIDKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=abbed596652773468508d937a99472988ebdda28db8c543b79abe527c99646f6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BEDB6CD16BD8FBD810E0A53F2B92CE7FD9AB37DD50427E28109CBB133F9887D3, cn=SATISH JAGDERAO TIDKE
Date: 2023.07.07 13:33:39 +05'30'

**( सतीश तिडके )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे विशेष कार्यकारी अधिकारी.
५. मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद, विधान भवन, मुंबई.
६. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा, विधान भवन, मुंबई.
७. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर.
९. महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर.
१०. संबंधित संस्था यांचे कुलगुरु/संचालक/प्राचार्य (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत)
११. नियोजन विभाग/वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवडनस्ती/तांशि-३.